केंद्र शासनाकडून राज्यास भांडवली खर्चासाठी कर्ज स्वरुपात विशेष सहाय्य योजना भाग-१ अंतर्गत (बिनव्याजी कर्ज) महावितरण कंपनीला रु. १७९.०० कोटी निधी वितरित करणेबाबत सन २०२२-२३.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.५६/ऊर्जा-३,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३० मार्च, २०२३.

संदर्भ:-१. भारत सरकार,वित्त मंत्रालय यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र. F.no.४४(१))/pf-s/२०२२-२३ (CAPEX), दि.०६/०४/२०२२.
२. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण- २०२१/प्र.क्र.५१/२०/कोषा प्रशा-५,दि.१५/०९/२०२१.
३. शासन पत्र वित्त विभाग क्र. संकीर्ण -२०२२/प्र.क्र.१५/अर्थबळ, दि.१९/०४/२०२२
४. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.११२/ऊर्जा-३, दि. १६/११/२०२२
५. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.बीजीएम-२०२२/प्र.क्र.५६/ऊर्जा-३, दि. २१/११/२०२२
६. शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक : पूरक-२०२२/प्र.क्र.९६/अर्थ-३, दि.२३/१२/२०२२.
७. शासन पत्र, वित्त विभाग क्रमांक : संकिर्ण-२०२२/प्र.क्र.१४ भाग-२/अर्थबळ, दि.२६/१२/२०२२. .
८. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.बीजीएम-२०२२/प्र.क्र.५६/ऊर्जा-३, दि. ०५/०१/२०२३
९. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.बीजीएम-२०२२/प्र.क्र.५६/ऊर्जा-३, दि.२३/०३/२०२३
१०.शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.बीजीएम-२०२२/प्र.क्र.५६/ऊर्जा-३, दि.२९/०३/२०२३
११. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र क्र. पुनर्वि-२०२३/प्र.क्र.२४/उर्जा-३ दि. ३०/०३/२०२३

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने राज्यांना भांडवली खर्चासाठी विशेष सहाय्य योजनेअंतर्गत ५० वर्ष मुदतीचे बिनव्याजी कर्ज उपलब्ध करुन देण्याचा निर्णय घेतला आहे. सदर योजनेअंतर्गत ऊर्जा विभागाला रु. ५००.०० कोटी मंजूर करण्यात आले आहेत. सदर तरतूद सन २०२२ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे लेखाशिर्ष ६८०१०७१८ खाली अर्थसंकल्पित केला आहे. यापैकी रु.२५० कोटी इतका निधी उपरोक्त संदर्भ क्र. ८ च्या शासन निर्णयान्वये व रु. १७९ कोटी इतका निधी उपरोक्त संदर्भ क्र. ९ च्या शासन निर्णयान्वये व रु. ७१ कोटी इतका निधी उपरोक्त संदर्भ क्र. १० च्या वितरीत करण्यात आली आहे व आता वित्त विभागाने संदर्भ क्र. ११ च्या शासन निर्णयान्वये रु. १८२.०० कोटी पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन दिलेले आहेत. सदर रु.१८२.०० कोटीमधून रु. १७९.०० कोटी वित्त विभागाने वितरित करण्यास अनुमती दिल्यानुसार सदर रक्कम महावितरणला वितरित करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजनेअंतर्गत भाग-१ खाली सन २०२२-२०२३ मध्ये पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन दिलेल्या रु.१८२.०० कोटीमधून रु. १७९.०० कोटी (रुपये एकयो एकोणऐंशी कोटी फक्त) रक्कम महावितरण कंपनीकडील खालील नमूद प्रकल्पांकरिता वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्रकल्पाचे नाव | प्रकल्पाचे स्वरुप | वितरणाची रक्कम (रु. कोटी) | अमलबजावणी यंत्रणा |
|---|---|---|---|---|
| १ | एमआयडीसी क्षेत्रातील पायाभूत सुविधांचे बळकटीकरण | नवीन प्रकल्प | १७९.०० | महावितरण |
| | | **एकूण** | **१७९.००** | |

२. उक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च “मागणी क्र. के-११, ६८०१ वीज प्रकल्पासाठी कर्जे, (००), (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील इतर उपक्रमांना कर्जे, (०१) केंद्रशासनाकडून राज्यांना भांडवली

गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजनेअंतर्गत बिनव्याजी कर्जे (केंद्र हिस्सा १००%), (००) (०१) महानिर्मिती, महापरेषण आणि महावितरण कंपनीच्या पायाभूत प्रकल्पासाठी बिनव्याजी कर्ज (योजना भाग-१) (६८०१०७१८)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. उपरोक्त लेखाशिर्षाखालील निधी आहरित करण्यासाठी ऊर्जा विभागाचे "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून श्री.ना.रा.ढाणे, अवर सचिव, मंत्रालय, मुंबई आणि "नियंत्रण अधिकारी" म्हणून श्री. ना. श्री. कराड, उप सचिव, मंत्रालय, मुंबई यांना घोषित करण्यात येत आहे.

४. सदर योजनांचे अंमलबजावणीसाठी प्रशासकीय विभाग स्तरावर State Scheme Manager (SSM) म्हणून, उप सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांची निवड केली असून ते सदर योजंनेचे Single Nodal Agency (SNA) म्हणून काम पाहतील. तसेच First Level Agency म्हणून अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग हे काम पाहतील.

५. सदर निधी उपलब्ध करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी यांनी अधिदान व लेखा अधिकारी मुंबई यांचेकडे देयके सादर करुन त्यांनी बँक ऑफ महाराष्ट्र मधील UNDER SECRETARY IELD SPECIAL ASSISTANCE TO STATES या खात्यावर प्राप्त होणारा निधी PFMS प्रणालीद्वारे महावितरण कंपनी वांन्द्रे पुर्व, मुंबई-५१ यांना देण्यासाठी त्यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही "ऊर्जा-३" कार्यासनाने करावी.

६. सदर निधी आहरण व संवितरण अधिकारी यांनी अधिदान व लेखा अधिकारी मुंबई यांचेकडे देयके सादर करुन प्राप्त निधी महावितरण कंपनी वांन्द्रे पुर्व, मुंबई-५१ यांना देण्यासाठी त्यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही "ऊर्जा-३" कार्यासनाने करावी.

७. केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजनेअंतर्गत भाग १-खाली प्राप्त होणाऱ्या कर्जाच्या रक्कमांसाठी महावितरण कंपनीने महालेखापाल यांनी विहित केलेल्या नमुन्यात लेखे ठेवावेत.

८. केंद्र शासनाने ज्या प्रकल्पांसाठी निधी मंजूर केला आहे, त्याच प्रकल्पासाठी व त्यातील प्रयोजनासाठीच निधी दिनांक ३१.०३.२०२३ पुर्वी खर्च होईल याची महावितरण कंपनी यांनी खबरदारी घ्यावी व अशा खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र दिनांक १० एप्रिल, २०२३ पुर्वी शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

९. सदर योजनेच्या भाग-१ खाली केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या कर्जावरील व्याज "००४९ व्याजाच्या जमा रक्कमा, १९० सार्वजनिक क्षेत्र व उतर उपक्रम यांजकडून व्याज, (०१) (०३) महाराष्ट्र राज्य वीज मंडळाला दिलेल्या कर्जावरील व्याज, ००४९०७३१" या लेखाशीर्षाखाली राज्य शासनाकडे तातडीने जमा करावे व भरणा केलेला रकमेच्या चलनाची प्रत शासनास सादर करावी.

१०. राज्य शासनाकडून दिल्या जाणाऱ्या सदर बिनव्याजी कर्जासाठी राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या कर्जा विषयीच्या इतर संबंधित अटी व शर्ती लागू राहतील. सदर बिनव्याजी कर्ज रक्कम वितरणासाठी वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४/०४/२०२२ मधील संबंधित सर्व अटींचे तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्ठामधील तपासणी सुचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

११. या लेखाशीर्षाखाली निधी वितरीत करण्यासाठी सादर करण्यात आलेल्या देयकाच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येते की, या लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता

प्रमाणपत्र प्रलंबित नाही. सदर शासन निर्णय, केंद्र शासनाकडील प्राप्त बीनव्याजी कर्जासाठी वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२३०३३०११४०५३६४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2023.04.10 16:59:41 +05'30'

**( ना. रा. ढाणे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. सर्व मंत्रीयांचे खाजगी सचिव,
५. सर्व विधानमंडळ सदस्य, विधान भवन, मुंबई,
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक,सर्व मंत्रालयीन विभाग,
१२. सर्व विभागीय आयुक्त,
१३. सर्व जिल्हाधिकारी,
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा,
१५. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
१६. अधिदान व लेखा अधिकारी (अराप/रालेवि-१), मुंबई.
१७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१८. सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई (पत्राने),
१९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सूत्रधारी कंपनी मर्या., मुंबई,
२०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.,मुंबई,
२१. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,
२२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या., मुंबई,
२३. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे,
२४. उप सचिव (ऊर्जा-३/४/५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२५. ऊर्जा उप विभागातील सर्व कार्यासने,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२६. निवड नस्ती, ऊर्जा-३, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.